**जिल्हा खनिज प्रतिष्ठान, बीड च्या कार्यकारी परिषदेतील (Governing Council) नामनिर्देशित सदस्यांची नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
शासन निर्णय क्र.डीएमएफ-०११८/प्र.क्र. ०६/उद्योग-९,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०१.१०.२०१८.

**पहा-** १. शासन अधिसुचना क्र. एमडीएफ ६१५/५१/प्र. क्र. ३४/ उद्योग-९, दिनांक ०१.०९.२०१६. (महाराष्ट्र शासन राजपत्र, प्रकाशित दिनांक ०७.०९.२०१६.)
२. शासन अधिसुचना क्र. एमडीएफ ०६१५/प्र. क्र. ३४/ उद्योग-९, दिनांक ०१.०९.२०१६. (महाराष्ट्र शासन राजपत्र, प्रकाशित दिनांक ०७.०९.२०१६.)

## प्रस्तावना :-

खाण मंत्रालय, भारत सरकार यांनी खाण व खनिजे (विकसन व विनियमन) अधिनियम, १९५७ मध्ये सुधारणा करून खाण व खनिजे (विकसन व विनियमन) सुधारणा अधिनियम, २०१५ हा शासन अधिसुचना, दिनांक २७.०३.२०१५ अन्वये अधिसूचित केला आहे.

२. प्रस्तुत खाण व खनिजे (विकसन व विनियमन) सुधारणा अधिनियम, २०१५ मधील कलम ९ (B) मधील तरतुदींनुसार राज्यातील प्रत्येक जिल्ह्यामध्ये खाणबाधित क्षेत्र व व्यक्तींच्या विकासाकरिता जिल्हा खनिज प्रतिष्ठान स्थापन करणे अपेक्षित आहे. सदरील तरतुदींच्या अनुषंगाने दिनांक ०१.०९.२०१६ च्या शासन अधिसुचने अन्वये जिल्हा खनिज प्रतिष्ठानची स्थापना, रचना व कार्यपध्दतीबाबतचे नियम निर्गमित करण्यात आले आहेत.

३. सदर नियमातील तरतुदींच्या अनुषंगाने जिल्हा खनिज प्रतिष्ठान, बीड च्या कार्यकारी परिषदेमधील (Governing Council) नामनिर्देशित सदस्यांच्या नियुक्तीकरिता बीड जिल्ह्याचे पालक मंत्री तथा अध्यक्ष जिल्हा खनिज प्रतिष्ठान, बीड यांच्याकडून शिफारस प्राप्त झाली आहे. सदर शिफारशींच्या अनुषंगाने जिल्हा खनिज प्रतिष्ठान, बीड च्या कार्यकारी परिषदेवरील (Governing Council) नामनिर्देशित सदस्यांच्या नियुक्तीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात घेता शासन अधिसुचना दिनांक ०१.०९.२०१६ च्या तरतुदींच्या अनुषंगाने जिल्हा खनिज प्रतिष्ठान, बीड च्या कार्यकारी परिषदेवर (Governing Council) पुढील सदस्यांची नामनिर्देशित सदस्य म्हणून नियुक्ती करण्यास सहमती देण्यात येत आहे.

## प्रतिष्ठानचे नाव- जिल्हा खनिज प्रतिष्ठान, बीड.

| अ. क्र. | सदस्य | पदनाम | नामनिर्देशन / शिफारस |
|---|---|---|---|
| ०१ | जिल्ह्यातील विधानसभा / विधानपरिषद सदस्यांमधून कमाल ०३ सदस्य | सदस्य | ०१. मा. श्री. आर.टी.देशमुख, विधानसभा सदस्य (माजलगाव).<br>०२. मा. श्री. लक्ष्मणरावजी पवार विधानसभा सदस्य (गेवराई).<br>०३. मा. श्री.भिमरावजी धांडे, विधानसभा सदस्य (आष्टी-पाटोदा-शिरूर). |
| ०२ | जिल्ह्यातील सेवाभावी संस्थांमध्ये कार्यरत व्यक्तींमधून कमाल ०२ सदस्य | सदस्य | ०१. श्री हनुमंत नामदेव नागरगोजे, चैतन्य सेवाभावी संस्था, औरंगापूर, ता. परळी, जि. बीड.<br>०२. श्री बिभीषण रोकडीबा फड, स्व. भ. की. सबनीस सेवाभावी संस्था, अंबाजोगाई, जि. बीड. |
| ०३ | जिल्हा खनिज प्रतिष्ठानास अंशदान देणारे संबंधित जिल्ह्यातील खाणपट्टाधारकाचे प्रतिनिधी कमाल ०३ सदस्य | सदस्य | ०१. श्री उदयसिंह जगमोहन दिख्खत, रा. धारूर, जि. बीड.<br>०२. श्री देविलाल चुन्नीलाल पांडे, रा. परळी वैजनाथ, जि.बीड.<br>०३. श्री हरिभाऊ तात्याराव देशमुख, रा. कुंडी, ता. धारूर, जि.बीड. |

२. उपरोक्त नमूद सदस्यांच्या कार्यकाळाबाबत दिनांक ०१.०९.२०१६ च्या शासन अधिसुचनेतील सर्व तरतुदी लागू राहतील. उपरोक्त नामनिर्देशित सदस्यांची नियुक्ती पुढील ०३ वर्षांकरिता अथवा ते सदर पदावर कार्यरत असतील या पैकी जे अगोदर असेल त्या कालावधीकरिता या शासन निर्णयाच्या दिनांकापासून करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८०९२९१५५०४४२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Deepali Sayaji Patil

Digitally signed by Deepali Sayaji Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b9e1548d824e3f7009891624cf665609c7dcf4fc02e9f55da5f39a5a910d5949, serialNumber=c6d4814154203bcf6158f33c52a854240c9e522b4fabfc2851bf7dfe1d4616ba, cn=Deepali Sayaji Patil
Date: 2018.10.01 15:36:14 +05'30'

**(दिपाली पाटील)**

कक्ष अधिकारी

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

२) मा. मंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. पालक मंत्री तथा अध्यक्ष जिल्हा खनिज प्रतिष्ठान, बीड यांचे स्वीय सहायक.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई-४०० ०३२.
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई-४०० ०३२.
६) मा. राज्यमंत्री (खनिकर्म) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
७) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा खनिज प्रतिष्ठान, जिल्हाधिकारी कार्यालय, बीड.
८) मा. श्री. आर.टी.देशमुख, विधानसभा सदस्य तथा सदस्य जिल्हा खनिज प्रतिष्ठान, बीड.
९) मा. श्री. लक्ष्मणरावजी पवार, विधानसभा सदस्य तथा सदस्य जिल्हा खनिज प्रतिष्ठान, बीड.
१०) मा. श्री. भिमरावजी धांडे, विधानसभा सदस्य तथा सदस्य जिल्हा खनिज प्रतिष्ठान, बीड.
११) श्री. हनुमंत नामदेव नागरगोजे, चैतन्य सेवाभावी संस्था, औरंगापूर, ता. परळी, जि. बीड.
१२) श्री. बिभीषण रोकडीबा फड, स्व. भ. की. सबनीस सेवाभावी संस्था, अंबाजोगाई, जि. बीड..
१३) श्री. उदयसिंह जगमोहन दिख्खत, रा. धारूर, जि. बीड
१४) श्री. देविलाल चुन्नीलाल पांडे, रा. परळी वैजनाथ, जि.बीड.
१५) श्री. हरिभाऊ तात्याराव देशमुख, रा. कुंडी, ता. धारूर, जि.बीड.
१६) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
१७) जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
१८) अपर मुख्य सचिव (उद्योग), यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग. मंत्रालय, मुंबई ३२.
१९) उपसचिव (खनिकर्म), यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२०) जिल्हा खनिकर्म अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, बीड.

यांना विनंती करण्यांत येते की त्यांनी जिल्हा खनिज प्रतिष्ठान, बीड च्या कार्यकारी परिषदेतील (Governing Council) उपरोक्त नामनिर्देशित सदस्यांना सदरील नामनिर्देशनाबाबत आपलेस्तरावरून अवगत करावे.

२१) निवड नस्ती (उद्योग-९).